# स्वातंत्र्याची ऊब

मराठी : गार्गी लागू

जान हेनरी, इतर कोणत्याही मुलांपेक्षा चांगला पोहतो. एखाद्या माशासारखा तो पाण्यात सुरकांड्या मारतो, आणि एखाद्या राक्षसासारखे बुडबुडे उडवितो. पण तो माझ्याबरोबर शहरातल्या तरणतलावात पोहत नाही. कारण त्याला त्या तलावात पोहोण्याची परवांगी नाही.

जो आणि जान हेनरी, कितीतरी बाबतीत एकसारखे आहेत. दोघांना नेमबाजी करायला आवडते. दोघांनाही मोठेपणी फायरमन व्हायचे आहे. दोघांना पोहायला खूप आवडते. पण एका बाबतीत ते एकमेकापेक्षा वेगळेही आहेत. जो गोरा आहे आणि जान हेनरी कृष्णवर्णी आहे. १९६४ मधे दक्षिणेत याचा अर्थ आहे की जान हेनरीला त्याच्या आवडत्या मित्राबरोबर सर्व गोष्टी बरोबर करण्याची अनुमती नाही आहे.

काही काळानंतर एक कायदा मान्य होतो ज्यानुसार शरीराच्या रंगावरून भेदभाव करणे बंद केले जाते. मग शहरातील तरणतलाव सर्वासाठी खुला होतो. त्यामुळे जो आणि जान हेनरी यांना एव्हढा आनंद होतो की तलावाकडे जाण्यासाठी स्पर्धा सुरू होते. पण...... कायदा पारित करणे सोपे आहे तितकेच लोकांमधे मतपरिवर्तन घडविणे फार कठीण......त्याला जास्त वेळ लागतो.

"स्वातंत्र्याची ऊब " या पुस्तकात १९६४ साली समान नागरी हक्काचा  कायदा मान्य झाल्यावर दोन लहान मुलांना वर्णभेदामुळे आलेले अनुभव, व त्याची दोस्ती याचे मार्मिक वर्णन केले आहे.

# नोट

१९६० दशकाच्या सुरवातीला अमेरिकेच्या दक्षिण भागात अश्वेत  लोक गोर्या लोकासाठी असलेल्या नळातून पाणी पिऊ शकत नव्हते. गोर्या आणि कृष्णवर्णिय मुलांसाठी वेगवेगळ्या शाळा होत्या. कृषणवर्णिय लोक सार्वजनिक क्षेत्रात गोर्या लोकांच्या बरोबरीने वावरू शकत नव्हते. नंतर १९६४ मधे समान नागरी कायदा मान्य झाला ज्यानुसार सर्व सार्वजनिक क्षेत्रामधे सर्वांना समान अधिकार मिळाले मग ते कोणत्याही जातीचे, धर्माचे, वर्णाचे असोत, वा त्यांचा जन्म कुठेही झालेला असो.

मी आलाबामामधील मोबाइल गावी एका गोरा मुलगा म्हणून जन्मलो. उन्हाळ्यात मिसिसिपी येथे रहाणार्या प्रिय नातलगाकडे जात असे. जेव्हा समान नागरी कायदा जारी केला गेला तेव्हा शहरातील तरणतलाव बंद करण्यात  आला. रोलर रिंक व आइसक्रीमची दुकानेही बंद करण्यात आली. कृष्णवर्णियांना त्यांचे अधिकार देण्याऐवाजी बर्याच व्यावसायिकांनी कायद्याला विरोध दर्शविण्यासाठी व्यवसायच बंद करण्याचा निर्णय घेतला. त्यातील काही उद्योग कायमचे बंद झाले.

१९६४ च्या उन्हाळ्यात मिसिसिपीच्या नागरी अधिकार कार्यकर्त्यांनी अश्वेत अमेरिकन लोकांना मतदानाचा अधिकार मिळवून देण्यासाठी त्यांना एकत्र आणण्यासाठी आंदोलन उभे केले. तो सामाजिक परिवर्तनाचा म्हणूनच हिंसक आदोलनाचा काळ होता. याच बर्यावाईट परिस्थितीवर लक्ष ठेवायला मी सुरवात केली. माझ्या अस लक्षात आले की कृष्णवर्णिय लोक नेहमी मागिल दाराचा उपयोग करीत होते. प्रत्येक गोर्या माणसाचे काम झाल्यावरच कृष्णवर्णियांकडे लक्ष दिले जात होते.केवळ त्यांच्या त्वचेच्या रंगामुळे त्यांना अशी वागणूक मिळत होती. माझ्या लक्षांत आले की याचा  पारित झालेल्या कायद्याशी काही संबंध नाही. मग मला जाणवले की एखाद्या गोर्या माणसाला कृष्णवर्णिय मित्र असणे किती धोक्याचे असू शकते. मी विचार आणि द्रुष्य मनातून काढून शकलो नाही. माझ्या मनात आले की माझ्या वयाच्या कृष्णवर्णिय मुलाला काय वाटत असेल.....! हे सर्व बदलून टाकायच स्वप्नही मी पाहिले. पण मग मनात आले की कोणतेही लहान मुल असो, गोरे किंवा काळे, मी काय करू शकणार आहे?

ही गोष्ट त्यावेळच्या माझ्या भावनाकल्लोळातून निर्माण झाली आहे. काल्पनिक जरूर आहे पण सत्य घटनांवर आधारित आहे.

जान हेनरी वडेल माझा सर्वात चांगला मित्र होता.
त्याची आई माझ्या आईसाठी काम करीत असे.
हेनरीच्या आईचे नाव एनी मॅई होते
एनी मॅई दररोज सकाळी ८वाजता काउंटी बसमधून उतरत असे.
व आणि उंच पहाड चढून माझ्या घरापर्यंत येत असे.
उन्हाळ्याच्या दिवसांत हेनरीपण तिच्या पाठोपाठ असायचा



आम्ही एनी मॅईला मदत करीत असू. समोरिल अंगण झाडत असू. मांजरींना घरात जाऊ देत होतो, आणि नंतर बाहेर पळवून लावित होतो. शेवटा एनी मॅई आम्हाला सांगायची, "तुम्ही दोघे फार गोंधळ घालित अहात. जा, बाहेर जाऊन खेळा...!" मग आम्ही बाहेर जाऊन मातीमधे, चिखलात दगड गोळा करून खेळत असू. ऊन खूप वाढलं, अगदी सहन होइनास झालं की आम्ही ,"जो शेवटी पोहोचेल तो कुजलेलं अंड होईल" असे जोरजोराने ओरडत नदी दिशेने धावत सुटायचो.






जान हेनरी इतर कोणत्याही मुलापेक्षा चांगलं पोहायचा. एखादा मासा पाण्यात सुरकांड्या मारतो हेनरी पाण्यात सुरकांड्या मारायचा. पाण्यात खाली जाऊन राक्षसासारखे बुडबुडे काढायचा. पण तो माझ्याबरोबर शहरातील तरणतलावात पोहू शकत नव्हता.

त्याला तिथे पोहण्याची परवांगी नव्हती.

मग आम्ही डोंगरावर दगड, आणि काट्याकुट्यानी बांध घालून वाहत पाणी अडवायचो आणि आमच्यासाठी तरणतलाव तयार करायचो. तरणतलाव मनासारखा तयार झाला की कपडे काढून, अगदी नंगे होऊन पाण्यात उड्या मारायचो.

जान हेनरीच्या अंगाचा रंग राखाडी, तुकतुकीत होता. खूप पाऊस पडून गेल्यावर पाईनच्या काट्यांना सुगंध येतो तसाच वास त्याच्या अंगाचा येत असे.

माझ्या अंगाचा रंग फिकट पिवळ्या फुलपाखरासारखा होता, जी रात्री आमच्या घरांतून बाहेर पडणार्या उजेडांत नाचतांना दिसायची. हेनरी म्हणायचा माझ्या अंगाला धुतलेल्या मोज्यासारखा वास येतो. हे ऐकून मी जोराने ओरडायचो...."याचा अर्थ.....मारामारी" ! मग आम्ही पाण्यात जोरजोराने हात मारायचो.....पांढरा फेस तयार होईपर्यंत.....आणि अगदी पोट फाटेपर्यंत हसत सुटायचो. कधी आम्ही पाठीवर तरंगायचो आणि व्हेल माशासारखे तोंडातून पाण्याचे फवारे उडवायचो.

"मी मोठेपणी अग्नीरक्षक होणार!" मी म्हटले.

"मी पण," हेनरी पण तेच म्हणाला.






माझ्याजवळ बर्फाचे गोळे घेण्यासाठी दोन नाणी होती. आम्ही कपडे घालून शहराच्या दिशेने गेलो. हेनरी मेसन जनरल स्टोअरच्या पुढील दरवाजातून आत जाऊ शकत नव्हता. त्याला परवांगी नव्हती. "कसं काय चालले आहे, जो?” मिस्टर मेसननी माझी चौकशी केली. "काय, हे दोनही गोळे तू एकटा खाणार आहेस?”

माझी छाती धडधडायला लागली.

"यांतील एक माझ्या मित्रासाठी आहे," असे सांगून मी दरवाजाबाहेर पळ काढला.

"हो, बरोबर, तिथे खूप गरम होत असेल," मिस्टर मेसन मला म्हणाले.

"मला बर्फाचा गोळा खूप आवडतो," जान हेनरी म्हणाला.

"मला पण,..." मी म्हटले.



दररोज रात्री एनी मई आमच्या परिवारासाठी जेवण बनवित असे. ती मक्यावर लोणी लावित असे आणि बिस्किटं बनवित असे.

एके दिवशी वडिलांनी बर्फासारखा गार चहा पितांना सांगितले की, "उद्यापासून शहरातील तरणतलाव सर्वांसाठी खुला होणार आहे, मग ते कोणत्याही रंगाचे असले तरी....."

"हा नविन कायदा आहे," आई पण म्हणाली.तिने मटार पुलाव माझ्या पानात वाढला आणि म्हणाली , "आता आलेल्या नविन कायद्याप्रमाणे सर्व लोक, गोरे असो वा अश्वेत, समान नागरीक असतील. दुकाने, शौचालये, पिण्याच्या पाण्याचे नळ सर्वांसाठी खुले असतील."

मी हे ऐकून हरखूनच गेलो, आणि ही वार्ता जान हेनरीला सांगण्यासाठी स्वयंपाकघरात धूम ठोकली.

"उद्या मी शहरातील तलावात पोहणार आहे."
"तो खूप खोल आहे का."
"हो, तो खरच खूप खोल आहे," मी त्याला सांगितले. "आणि त्यातील पाणी इतके स्वच्छ आहे की तू पाण्याखाली जाऊन तू डोळे उघडे ठेऊ शकतोस आणि तुला सारे स्पष्ट दिसेल!"
"चल, आपण तिथे पोहणारी पहिली मुले असु," जान हेनरी म्हणाला.



दुसर्या दिवशी सकाळी, सूर्याचे आगमन आकाशात झाल्या झाल्या माझा सगळ्यात प्रिय मित्र, जान हेनरी वाडेल, धावत-धावत माझ्याकडे आला. "चला, जाऊ या," तो ओरडून म्हणाला. "मला माझ नाण पण मिळालं, आपण तलावापर्यंत धावत जाऊ या." असे म्हणू त्यांनी डोंगराच्या दिशेने धावायला सुरवात केली.

मग ते थांबले



तिथे डम्पर ट्रक उभे होते. आणि ते वेगाने खाली तलावाच्या दिशेने जात होते. मजूर तलावात डांबर टाकित होते. तलावात जिथे स्वच्छ पाणी होत तिथे आता काळ डांबर होते. मजूरामधील एक मजूर जान हेनरीचा मोठा भाऊ, विल राजर्स होता.

आम्ही त्याला विचारलं, "काय झालं?"

पण त्याने आम्हाला परत जाण्यासाठी खुणावलं, म्हणजे, "घरी परत जा."





पण आमचे पाय डांबरात फसले होते. आम्ही हलू शकत नव्हतो. त्यामुळे खूप वेळ पर्यंत तिथेच उभे राहिलो. आणि पूर्ण सकाळभर तलाव गरम डांबराने भरतांना पहात राहिलो. गरम डांबराच्या थरावरून वाफ हवेत मिसळत होती.

मजूरांनी त्यांच्या पायावर लाकडी फळ्या बांधल्या होत्या. त्याच्या सहाय्याने ते डांबर एका पातळीत आणण्याचा प्रयत्न करीत होते.

काम पूर्ण करून विल राजर्सने आपले फावडे रिकाम्या ट्रकमधे ठेवले. इतर मजूरांना ट्रकमधे घेतले. त्याचा चेहरा दु:खी होता. मला माहित होते की हे काम करायला त्याला आवडलं नव्हत. "चला, निघा," ट्रकचा मालक ओरडला, आणि ट्रक रस्त्यावरून निघून गेली.

काही वेळातच सर्व शांत झाले. आता आम्हाला गवतातून वहाणार्या वार्याचाही आवाज ऐकू येत होता. आम्ही तलावाच्या डाइविंग फळीवर बसलो. चांदीसारख्या दिसणार्या शिडीवर डांबर चिकटलेलं आम्ही पाहिले. मला धडकी भरली.

जान हेनरी कंपित आवाजात म्हणाला, "गोर्या लोकांना आपल्या तलावात काळ्या लोकांना पोहायला द्यायला आवडणार नाही."

"अस नाही, जान हेनरी," मी म्हटले.पण मला माहित होते की जान हेनरी बरोबर बोलत होता.

"चल, आपण पहाडावर जाऊ. मलाही या जुन्या तलावात पोहायचे नाही," मी म्हणालो.



जान हेनरीच्या डोळ्यात रागाने पाणी आले. "पण मला या तलावात पोहायच होतं, तू जे करतोस ते सर्व मला करायचे आहे."

मला काय बोलावे हे कळत नव्हते. पण जसे आम्ही शहराच्या दिशेने परत येत होते तेव्हा माझ्या मनात नवीन विचार येत होते. मला तर जाॅन हेनरी बरोबर डेयरी डीप मधे जायच होतं, आणि तिथे बसून रूट बीयर प्यायची होती. आम्ही दोघांनी बरोबर सिनेमाला जाव, पापकार्न खरेदी करून एकत्र सिनेमा पहावा....मला तर हेनरी नजरेतून शहर बघायचे होते.





आम्ही मिस्टर मेसनच्या स्टोअर समोर थांबलो. मी माझे दोनही हात खिशात घायले होते. पण डोक्यात वेगळेच विचार चालू होते. माझी बोट दोन नाण्यावर होती.

"तुला बर्फाचा गोळा खायचा आहे?"

जान हेनरीने आपले डोळे पुसले आणि एक मोठा श्वास घेऊन तो म्हणाला, "मी आपल्या हाताने गोळा घेणार...."

मला हेनरीची मागणी ठीक वाटली.

"चल, गोळे स्वत: काढून घेऊ या," मी म्हटले.

मी हेनरीला एक नाण दिलं.

त्याने मान हलवून नाही म्हटले.

"माझ्याजवळ माझे नाणे आहे"

आम्ही एकमेकांकडे रागावून पहायला लागलो.



त्यानंतर आम्ही नेहमी बरोबर दुकानाच्या पुढील दरवाजातून आत घुसतो.

समाप्त